GR-2004/008/423/4001-1201

पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीसाठी
योजनेंतर्गत निधी खर्च करण्याबाबत

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक लपायो १००३/वि.दु./प्र.क्र.१७/जल-१
दिनांक :- २२ मार्च,२००३

संदर्भ. वाचा:- १.महाराष्ट्र शासन, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
शासन निर्णय क्र. लपायो १०९४/प्र.क्र. ८१/जल-२अ/दि. २८ सप्टेंबर,१९९४.
२. महाराष्ट्र शासन नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. रोहयो २००३/प्र.क्र.११/रोहयो-६/दि. २८ जानेवारी , २००३.

प्रस्तावना :-

पाझर तलावांच्या विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता व तांत्रिक मान्यता देण्याचे वित्तीय अधिकार वरील शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आले होते. मात्र गेल्या अनेक वर्षात सर्वसाधारणपणे बाजारभावात विशेषत:बांधकाम साहित्याच्या किंमतीत व मजुरीत मोठ्या प्रमाणात वाढ झालेली असल्याने संदर्भाधीन अधिकार सुधारीत करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

वरील दिनांक २८.९.९४ च्या संदर्भीत शासन निर्णयातील (क) विशेष दुरुस्तीची कार्यपध्दती अंतर्गत क्रमांक (२) आणि क्र. (४) मधील आदेशातील अधिकारांबाबत खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मंजुरी देत आहे.

२) रु. ५,००,०००/-पर्यन्त संबंधीत अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर)मंडळ ,
पूर्ण अधिकार - मुख्य अभियंता , लघु पाटबंधारे (स्था.स्तर) पुणे.

वरील अधिकार प्राप्त अधिका-यांनी विशेष दुरुस्तीच्या कामास मंजुरी देण्यापूर्वी नियोजित कामास भेट देऊन, प्रस्तावित कार्याचे आकलन व नकाशे विचारात घेऊन दुरुस्तीचे उपचार/तरतुदी बरोबर असल्याची खातरजमा करावी व नंतरच कामास मंजुरी द्यावी.

३) विशेष दुरुस्तीच्या अंदाजपत्रकातील रो.ह.यो. खालील कामासाठी अकुशल : कुशल प्रमाणाची अट पूर्णत: शिथील करण्यात येत आहे.

वरील बदलांसहीत दि. २८ सप्टेंबर १९९४ च्या वरील संदर्भीत शासन निर्णयातील इतर सर्व अटी जशाच्या तशया लागू राहतील. तसेच दुरुस्तीपूर्व व दुरुस्ती नंतरचे फोटोग्राफीक पुरावे म्हणून जतन करुन ठेवण्यात यावेत. वरील सर्व आदेश गांवतलावांना देखील लागू राहतील व टंचाई परिस्थितीमुळे फक्त दि. ३० सप्टेंबर २००३ पर्यंत लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

22.3.2003
(वी.एम.केंकेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

C:\lotus\My Documents\TECHNICAL\P.T.REPAIRS G.R..doc 3